**शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई व संचालनालयाच्या अधिपत्याखालील विविध कार्यालयातील अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- अस्थामु-२०१६/प्र.क्र.२५/उद्योग-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :-०५ मार्च, २०२०

वाचा :- १) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक अस्थामु-२०१६/प्र.क्र.२५/ उद्योग-४, दि. १७.०९.२०१९.
२) संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक आस्था/अस्थायी पदे/२०१९-२०/३१३१/कार्या ४अ-१, दि. १८.०१.२०२०.
३) शासन निर्णय, वित्त विभाग,क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आपुक, दि. १२.०२.२०२०.

**शासन निर्णय :-**

संचालक, शासन मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई हया संचालनालयातील आणि संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय मुद्रणालये, शासकीय ग्रंथागारे आणि शासकीय लेखनसामग्री भांडारे यांच्या आस्थापनेवरील एकूण ८२० अस्थायी पदांना शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक अस्थामु-२०१६/ प्र.क्र.२५/उद्योग-४, दि. १७.०९.२०१९ (वाचा क्रमांक १) अन्वये दि. २९.०२.२०२० पर्यंतच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात आलेली आहे. आता वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयानुसार या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रामधील ८२० अस्थायी पदे दि. ०१.०३.२०२० ते दि. ३१.०८.२०२० पर्यंतच्या कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर अस्थायी पदांचा तपशील खालीलप्रमाणे आहे. :-

| अ.क्र. | कार्यालयाचे नांव | दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ दिलेली पदे | दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ प्रस्तावित असलेली पदे |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई | २२ | २२ |
| २ | शासकीय लेखनसामग्री भांडार,पुणे | ७ | ७ |
| ३ | शासकीय लेखनसामग्री भांडार, नागपूर | ३ | ३ |
| ४ | शासकीय लेखनसामग्री भांडार, औरंगाबाद | ५ | ५ |
| ५ | शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई | २३२ | २३२ |
| ६ | येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे | २०० | २०० |
| ७ | शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर | ११५ | ११५ |
| ८ | शासकीय फोटोझिंको मुद्रणालय, पुणे | ३८ | ३८ |
| ९ | शासकीय मुद्रणालय व लेखनसामग्री भांडार, कोल्हापूर | ५७ | ५७ |
| १० | शासकीय मुद्रणालय, औरंगाबाद | ६७ | ६७ |
| ११ | मध्यवर्ती कारागृह मुद्रणालय, नागपूर | ३४ | ३४ |
| १२ | शासकीय मुद्रणालय, वाई | ४० | ४० |
| | **एकूण :-** | ८२० | ८२० |

३. सदर ८२० अस्थायी पदांवर नियुक्त केलेले अधिकारी/कर्मचारी हे महागाई भत्ता व इतर भत्ते मिळण्यास पात्र आहेत.

४. यावरील खर्च यासोबतच्या विवरणपत्रामधील कार्यालयांनी त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभामध्ये नमूद करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली त्या-त्या वित्तीय वर्षासाठीच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/ २००४/वित्तीय सुधारणा-१, दि. ०४ ऑक्टोबर, २००४ मधील तरतदीनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे. त्याचा संकेतांक २०२००३०५१६५७११८२१० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Karansing Premsing Patil

Digitally signed by Karansing Premsing Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f2521c3a6d1f8429a3c2c9a42d575298ae82956908d63df441063695f377819, serialNumber=c7feed7178d6c14666a5df36811f1763590e65b6f836a87e63789dc234173d66, cn=Karansing Premsing Patil
Date: 2020.03.05 17:00:11 +05'30'

**( क. प्रे. पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई. (३ प्रती)
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई. (३ प्रती)
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई. (३ प्रती)
६. सर्व व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालये (संचालनालयामार्फत)
७. सर्व सहायक संचालक,शासकीय लेखनसामग्री भांडारे व ग्रंथागारे (संचालनालयामार्फत)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/पुणे/औरंगाबाद/कोल्हापूर. (प्रत्येकी ३ प्रती)
९. जिल्हा कोषागार अधिकारी, वाई, जि. सातारा. (३ प्रती)
१०. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई-३२.
११. कक्ष अधिकारी, प्रशासन-१, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. निवड नस्ती (उद्योग-४)